महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन ज्ञापन क्र. कुआयो-०४१९/प्र.क्र.१११/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०५ डिसेंबर २०१९.

विषय :- महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना याच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०) आणखी अनुदान खर्च करण्यास मंजुरी देणेबाबत.

संदर्भ :-
१) शा.नि., गृह विभाग, क्र. पीडब्ल्यूएफ-१२०४/ १४३/ प्र.क्र.२/ भाग-३/ पोल-७, दिनांक २८.०७.२००६.
२) शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १५.०५.२०१९.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.९२/ अर्थ-३, दिनांक ०८.०७.२०१९.
४) शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १६.०९.२०१९.
५) पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २८/ मपोकुआयो/ अंदाजपत्रक/ १९-२०/ १६४/ २०१६, दिनांक १९.१०.२०१९.

ज्ञापन.

शा.नि., गृह विभाग, क्र. पीडब्ल्यूएफ-१२०४/ १४३/ प्र.क्र.२/ भाग-३/ पोल-७, दिनांक २८.०७.२००६, व्दारे “महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना” ही नवीन योजना चालविण्यास मान्यता देण्यात आली आहे. या योजनेची अंमलबजावणी पोलीस महासंचालक, म.रा., व पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्याकडून करण्यात येते.

२. पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या बाबतीत उक्त योजनेचा खर्च हा, गृह विभाग-मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस, ००, ००१, संचालन व प्रशासन, (००) (००)(०१) पोलीस निरीक्षणालय (२०५५००१४) (अनिवार्य), ०१-वेतन, या लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा अशी तरतूद उक्त शासन निर्णयात करण्यात आली आहे. त्या अनुसार उक्त योजनेच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात रु.३०,००,००,०००/- (रुपये तीस कोटी फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास शासन पत्र, गृह विभाग, क्र. कुआयो-०४१९/ प्र.क्र.१११/ पोल-७, दिनांक १५.०५.२०१९ व दिनांक १६.०९.२०१९, यांद्वारे मंजुरी देण्यात आली आहे.

३. उक्त योजनेच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात आणखी निधीची आवश्यकता असल्याने त्यासाठी उक्त लेखाशीर्षाखाली आणखी अनुदान खर्च करण्यास मंजुरी मिळणेबाबतची विनंती पोलीस महासंचालक, म.रा., यांच्या कार्यालयाने केली आहे.

४. त्या अनुसार, महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजना याच्या प्रयोजनासाठी चालू वित्तीय वर्षात (सन २०१९-२०), उक्त लेखाशीर्षाखाली मंजूर अनुदानातून आणखी रु.२०,००,००,०००/- (रुपये वीस कोटी फक्त) इतकी रक्कम खर्च करण्यास, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे.

५. हे शासन ज्ञापन, अनौपचारिक संदर्भ, वित्त विभाग, क्र. ३६३/ २०१९/ व्यय-७, दिनांक ०७.११.२०१९, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. हे शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९१२०५१७१७०९२१२९ असा आहे. हे शासन ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL
GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735
ad885627, postalCode=400032, street=2ND
FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI,
serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2
cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.12.05 17:21:01 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
पोलीस महासंचालक,
म.रा., मुंबई.

**प्रत-**

१) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
२) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३) प्रधान महा लेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४) कार्यासन अधिकारी (अर्थसं.-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ अर्थ-११), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).